**कोकण रेल्वे महामंडळाचे वाढीव भागभांडवल खरेदी करण्यासाठी महामंडळास रु.३५.८९ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय-२०१६/प्र.क्र.४६/परिवहन-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २५ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :** १) गृह विभाग शासन निर्णय क्र.आरएलवाय-२०१६/प्र.क्र.४६/रेल्वे कक्ष, दिनांक : १३ सप्टेंबर, २०१७
२) कंपनी सचिव, कोकण रेल्वे महामंडळ यांचे पत्र क्र.KR/CO/S/Bonds/ ३rd Rights Issue, दिनांक २६.०७.२०२१ व २४.०८.२०२१.

**प्रस्तावना :**

कोकण रेल्वे महामंडळाच्या प्राधिकृत भागभांडवलात वाढ करणे आणि शासनाचे वाढीव भागभांडवल मंजूर करण्यास दिनांक ७ सप्टेंबर,२०१७ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता मिळालेली आहे. याबाबतचा शासन निर्णय क्र.आरएलवाय-२०१६/प्र.क्र.४६/रेल्वे कक्ष, दिनांक १३ सप्टेंबर, २०१७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

दिनांक १३ सप्टेंबर, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागाने कोकण रेल्वे महामंडळाच्या वाढीव अधिकृत भागभांडवलात शासनाच्या समभागाच्या प्रमाणामध्ये (२२%) अतिरिक्त रु.७०२.५७७६ कोटीचे समभाग टप्प्याटप्प्याने खरेदी करण्यात मान्यता देण्यात आलेली आहे. अतिरिक्त भागभांडवलापैकी आतापर्यंत पहिल्या, दुस-या व तिस-या हक्क भागाची राज्य हिश्श्याच्या भागभांडवलाची रु.१५६.५३२३ कोटी रक्कम कोकण रेल्वे महामंडळास अदा करण्यात आली आहे. आता तिस-या हक्क भागाच्या (Third Right Issue) रु.१०७.८० कोटी रक्कमेपैकी रु.३५.८९ कोटी (रुपये पस्तीस कोटी एकोण नव्वद लक्ष फक्त) इतकी रक्कम कोकण रेल्वे महामंडळास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कंपनी सचिव, कोकण रेल्वे महामंडळ (Chairman & Managing Director, Konkan Railway Corporation Ltd), कोकण रेल्वे, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.३५.८९ कोटी (रुपये पस्तीस कोटी एकोण नव्वद लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासन या निर्णयाव्दारे मंजूरी देत आहे.

२. शासनाने सह सचिव/उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व शासनाचे अवर सचिव/कार्यासन अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून, या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.बी.-१०, ५००२-भारतीय रेल्वे यावरील भांडवली खर्च (व्यावसायिक मार्ग), १४-शासनाच्या व्यावसायिक उपक्रमाकरिता गुंतवणूक, १९०-शासनाच्या व्यावसायिक

उपक्रमाकरिता गुंतवणूक (इतर सार्वजनिक क्षेत्र), (०१)(०१)-महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (५००२००१४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीचे तसेच उक्त परिपत्रकाच्या परिच्छेद ४ ते १३ मधील अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील क्रमांक १ ते १० मधील अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११३/१४६१, दिनांक २७.०९.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९७/२०२१/व्यय-८, दिनांक ११.१०.२०२१ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०३१५०४१९४४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2021.12.15 12:28:33 +05'30'

**( रा. मो. होळकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, कोकण रेल्वे महामंडळ, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) वित्त विभाग (व्यय-८/बीयुडी-११), मंत्रालय, मुंबई.
७) नियोजन विभाग, कार्यासन-१४६१, मंत्रालय, मुंबई.
८) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कमेचा धनादेश Konkan Railway Corporation Limited यांच्या नावाने काढण्यात यावा.
९) निवड नस्ती परिवहन -५.